जिल्हा आरोग्य अधिकारी, अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी , जिल्हा आरोग्य अधिकारी कार्यालय,जिल्हा परिषद, नंदूरबार या २ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१९/ प्र.क्र. २१८/ आरोग्य-३

१० वा मजला, गोकळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १५ ऑक्टोबर, २०१९

वाचा -

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- पदआ-२०१९/प्र.क्र.२१८/आरोग्य-३, दिनांक- ०८.०७.२०१९.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक, संआसे/कक्ष-१/वर्ग-१/टे-५/जिआअसं/अस्थाई पदे/न.क्र.१/२६३२/२०१९, दि.२४.०६.२०१९.

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नंदूरबार (१ पद) व अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नंदूरबार (१ पद) या २ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नंदूरबार (१ पद) व अतिरिक्त जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नंदूरबार (१ पद) या २ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रशासकिय अधिकारी, जिल्हा आरोग्य अधिकारी कार्यालय,जिल्हा परिषद, नंदूरबार (१ पद) याचा मुदतवाढीचा प्रस्ताव नसल्याने त्यास मुदतवाढ देण्यात आली नाही.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१९-२०२० या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० -७ - पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना-
राज्य योजनाअंतर्गत योजना
(०६)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०३६२)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक- ११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१४५५४४९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.10.15 16:03:06 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा आरोग्य अधिकारी, नंदूरबार.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार.
८. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)